**एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मधील परिविक्षाधिन उप जिल्हाधिकारी यांना महसूली विभाग वाटप व पदस्थापना देणेबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. सीपीटीपी-१२२१/प्र.क्र.१७९/ई-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ मार्च, २०२४

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) मा. भारत निवडणूक आयोगाचे क्र. ४३७/६/१/INST/ECI/FUNCT/MCC/२०२३, दि.२१.१२.२०२३, दि.२३.०२.२०२४ व दि.२७.०२.२०२४ रोजीची पत्रे.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
५) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१४/प्र.क्र.२०/१८-ब, दि.०७.११.२०१५
६) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०२४/प्र.क्र.०८/प्रशि-२, दि.२९.०२.२०२४ व दि.१२.०३.२०२४

**शासन आदेश:-**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ (सीपीटीपी-७) या तुकडीमधील परिविक्षाधीन उप जिल्हाधिकारी यांचे खातेनिहाय प्रशिक्षण दि.१७.०१.२०२२ पासून सुरु झाले होते. सदर अधिका-यांचा परिविक्षाधिन कालावधी हा दोन वर्षाचा आहे. एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ (सीपीटीपी-७) या तुकडीमधील अधिका-यांचा परिविक्षाधिन कालावधी पूर्ण झालेला आहे. त्यानुसार, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा), पुणे यांनी दि.२४.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या मूल्यमापन व गुणपत्रकाच्या आधारे सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन क्र.६ येथील पत्रांन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मधील परिविक्षाधिन उप जिल्हाधिकारी यांची गुणानुक्रमे सेवाज्येष्ठता निश्चित केली आहे. त्यानुषंगाने उप जिल्हाधिकारी संवर्गातील विभागनिहाय रिक्त पदांची संख्या विचारात घेऊन तसेच, सामान्य प्रशासन विभागाकडून प्राप्त गुणवत्ता यादीतील क्रमांकानुसार संदर्भाधिन क्र.२ येथील नमूद अधिसूचनेमधील तरतूदीनुसार महसूली विभाग वाटपासंदर्भात संबंधित ३७ उप जिल्हाधिकारी यांचेकडून विकल्प मागविण्यात आले आहेत.

२. "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१" नुसार एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मध्ये प्रशिक्षण घेतलेल्या ३७ परिविक्षाधिन उप जिल्हाधिकारी (गट-अ) यांना स्तंभ क्र.४ अन्वये महसूली विभाग वाटप करण्यात येत असून त्यांना मा. भारत निवडणूक आयोगाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रांन्वये विहित केलेल्या तरतुदी व महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) मधील तरतुदींनुसार स्तंभ क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सा.प्र.वि. ने निश्चित केलेला ज्ये. क्र. | महसूली विभाग वाटप | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. प्रसाद भस्वेश्वर चौगुले | १ | पुणे | उप जिल्हाधिकारी (भूसंपादन क्र.२२), पुणे या रिक्त पदावर |
| २. | श्री. रविंद्र अप्पासाहेब शेळके | २ | कोकण-२ | उप जिल्हाधिकारी (सामान्य), रायगड या रिक्त पदावर |
| ३. | श्री. अनुपसिंह अरूणकुमार यादव | ३ | नाशिक | उप जिल्हाधिकारी (लपा), नाशिक या रिक्त पदावर |
| ४. | श्री. रोहन रघुनाथ कुंवर | ४ | नाशिक | विशेष भूसंपादन अधि, (मपाप्र), धुळे या रिक्त पदावर |
| ५. | श्री. अरुण विलास उंडे | ५ | नाशिक | पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. |
| ६. | श्री. एकनाथ दत्तात्रय बंगाळे | ६ | छ. संभाजीनगर | पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. |
| ७. | श्री. अनुप शशिकांत पाटील | ७ | छ. संभाजीनगर | विशेष भूसंपादन अधि (लसिका), नांदेड या रिक्त पदावर |
| ८. | श्री. समाधान मायाप्पा घुटुकडे | ८ | छ. संभाजीनगर | उप जिल्हाधिकारी (सामान्य), हिंगोली या रिक्त पदावर |
| ९. | श्री. अजिंक्य अशोक गोडगे | ९ | अमरावती | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (इवद), बुलढाणा या रिक्त पदावर |
| १०. | श्री. प्रियेश लखुचंद महाजन | १० | नागपूर | उप जिल्हाधिकारी भूसं (विपाविम क्र.२) गोसेखुर्द, नागपूर या रिक्त पदावर |
| ११. | श्री. दादासाहेब सुखदेव दराडे | ११ | अमरावती | उप जिल्हाधिकारी (भूसंपादन-१), वाशिम या रिक्त पदावर |
| १२. | श्री. समाधान भास्कर गायकवाड | १२ | अमरावती | उप जिल्हाधिकारी (महसूल), बुलढाणा या रिक्त पदावर |
| १३. | श्री. गोपाळ व्यंकटराव देशपांडे | १३ | अमरावती | उप विभागीय अधिकारी, यवतमाळ या रिक्त पदावर |
| १४. | श्री. पद्माकर नरहरी गायकवाड | १४ | छ. संभाजीनगर | उप जिल्हाधिकारी (रोहयो), जालना या रिक्त पदावर |
| १५. | श्री. अजय दत्तात्रय शिंदे | १५ | छ. संभाजीनगर | उप जिल्हाधिकारी (सामान्य), नांदेड या रिक्त पदावर |
| १६. | श्री. रामदास विष्णु दौंड | १६ | छ. संभाजीनगर | उप जिल्हाधिकारी (राजशिष्टाचार), छत्रपती संभाजीनगर या रिक्त पदावर |
| १७. | श्री. निखिल जिजाराम खेमनार | १७ | अमरावती | उप जिल्हाधिकारी (भूसंपादन) (केपीएमपी), अकोला या रिक्त पदावर |
| १८. | श्री. प्रसेनजित प्रकाश चव्हाण | १८ | अमरावती | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (अवप्र-४), अमरावती या रिक्त पदावर |

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सा.प्र.वि. ने निश्चित केलेला ज्ये. क्र. | महसूली विभाग वाटप | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १९. | श्री. ज्ञानेश्वर प्रल्हादराव घ्यार | १९ | अमरावती | उप जिल्हाधिकारी (रोहयो), अमरावती या रिक्त पदावर |
| २०. | श्री. हरेश मोहन सुळ | २० | अमरावती | उप जिल्हाधिकारी भूसंपादन (लसिका), अमरावती या रिक्त पदावर |
| २१. | श्री. गणेश तुकाराम खताळे | २१ | नागपूर | उप जिल्हाधिकारी (भूसंपादन) (उर्ध्व वर्धा प्रकल्प) वर्धा या रिक्त पदावर |
| २२. | श्रीमती मानसी सुरेश पाटील | २२ | नागपूर | उप जिल्हाधिकारी (सामान्य), गोंदिया या रिक्त पदावर |
| २३. | श्रीमती श्रद्धा बबन उदावंत | २३ | अमरावती | जिल्हा पुनर्वसन अधिकारी, अमरावती या रिक्त पदावर |
| २४. | श्रीमती जयश्री सुरेश ठाकरे | २४ | अमरावती | उप जिल्हाधिकारी (रोहयो), बुलढाणा या रिक्त पदावर |
| २५. | श्री. विरेंद्र कैलाशचंद्र जाधव | २५ | अमरावती | उप जिल्हाधिकारी (महसूल), वाशिम या रिक्त पदावर |
| २६. | श्री. विजय अशोक सुर्यवंशी | २६ | अमरावती | उप विभागीय अधिकारी, दारव्हा, जि. यवतमाळ या रिक्त पदावर |
| २७. | श्रीमती नुतन नामदेव पाटील | २७ | अमरावती | उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (अवप्र-२), अमरावती या रिक्त पदावर |
| २८. | श्रीमती स्नेहल दिपकराव रहाटे | २८ | नागपूर | उप विभागीय अधिकारी, गोंडपिंपरी, जि. चंद्रपूर या रिक्त पदावर |
| २९. | श्रीमती स्वाती कृष्णा देसाई | २९ | नागपूर | उप जिल्हाधिकारी (रोहयो), नागपूर या रिक्त पदावर |
| ३०. | श्री. गौरव साहेबराव इंगोले | ३० | छ. संभाजीनगर | उप विभागीय अधिकारी, माजलगाव, जि. बीड या रिक्त पदावर |
| ३१. | श्री. शुभम राजेश मदने | ३१ | नागपूर | उप जिल्हाधिकारी (रोहयो), चंद्रपूर या रिक्त पदावर |
| ३२. | श्रीमती प्रतिक्षा पोपटराव भुते | ३२ | नागपूर | सहायक आयुक्त (भूसुधार), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर या रिक्त पदावर |
| ३३. | श्रीमती शारदा बाळासाहेब जाधव | ३३ | नागपूर | उप जिल्हाधिकारी (महसूल), भंडारा या रिक्त पदावर |
| ३४. | श्री. एकनाथ व्यंकटराव काळबांडे | ३४ | पुणे | उप जिल्हाधिकारी भूसंपादन क्र.६, कोल्हापूर या रिक्त पदावर |
| ३५. | श्रीमती सायली अशोक सोळंके | ३५ | नागपूर | उप जिल्हाधिकारी भूसंपादन (लसिका), वर्धा या रिक्त पदावर |

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सा.प्र.वि. ने निश्चित केलेला ज्ये. क्र. | महसूली विभाग वाटप | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ३६. | श्रीमती कविता विजय गायकवाड | ३६ | नागपूर | उप विभागीय अधिकारी, देवरी, जि. गोंदिया या रिक्त पदावर |
| ३७. | श्रीमती वसिमा महेबुब शेख | ३७ | नागपूर | उप जिल्हाधिकारी (पुनर्वसन), नागपूर या रिक्त पदावर |

३. श्री. अरुण विलास उंडे व श्री. एकनाथ दत्तात्रय बंगाळे यांनी पुढील आदेशापर्यंत अनुक्रमे विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक व छत्रपती संभाजीनगर येथे रुजू व्हावे.

४. उक्त परिविक्षाधिन उप जिल्हाधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून नियमित पदावर पदस्थापना देण्यात येत आहे :-

(अ) सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र. ४ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षणाचे धोरण निश्चित करण्यात आले असून संदर्भाधिन क्र. ५ येथे नमूद केलेल्या शासन अधिसूचनेन्वये एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांची सेवाज्येष्ठता निश्चित करण्याचे नियम विहित केले आहेत. तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.०७.२०१७ अन्वये राज्यसेवा परीक्षेद्वारे शासन सेवेत निवड झालेल्या अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम राबविण्यात येत आहे. या अभ्यासक्रमामध्ये मुंबई विद्यापीठाच्या मूल्यांकन पद्धतीचा अभ्यासक्रम राबविण्यात येत आहे. या अभ्यासक्रमामध्ये मुंबई विद्यापीठाच्या मूल्यांकन पद्धतीचा अवलंब करुन दोन वर्षाच्या प्रशिक्षण कालावधीत एकूण चार सत्रामध्ये घेण्यात येणा-या परीक्षांती एकूण १६०० गुणांपैकी प्राप्त होणाऱ्या गुणांचे २०० गुणांमध्ये रुपांतर करुन संबंधित अधिका-यांना मिळालेले गुण तसेच राज्यसेवा (मुख्य) परीक्षेमध्ये मिळालेले गुण यांची बेरीज करुन त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची त्या तुकडीतील सेवाज्येष्ठता निश्चित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

त्यानुसार, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा), पुणे यांनी दि.२४.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या मूल्यमापन व गुणपत्रकाच्या आधारे सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधिन क्र.६ येथील पत्रांन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ मधील परिविक्षाधिन उप जिल्हाधिकारी यांची गुणानुक्रमे सेवाज्येष्ठता निश्चित केली आहे.

(ब) सदर ज्येष्ठता तात्पुरती ज्येष्ठता म्हणून मान्य करण्यात आली आहे. या तात्पुरत्या ज्येष्ठता यादीतील क्रमांकानुसार अधिकाऱ्यांना संदर्भाधिन क्र. २ येथे नमूद केलेल्या अधिसूचनेमधील तरतूदींनुसार विभाग वाटप करण्यात आलेला आहे. सदर अधिका-यांनी वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागात किमान तीन वर्षे इतका सेवा कालावधी पूर्ण करणे अनिवार्य आहे.

५. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिका-यांनी आपल्या पदाचा कार्यभार संबंधित विभागीय आयुक्त/ कार्यालय प्रमुख यांच्या सल्ल्याने अन्य अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करुन पदस्थापनेच्या पदावर पदग्रहण

अवधी न उपभोगता तात्काळ रुजू व्हावे. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e२.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

६. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

९. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१४१७३७३२६७१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2024.03.14 17:47:27 +05'30'

**( संतोष वि. गावडे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२) सर्व विभागीय आयुक्त.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित जिल्हाधिकारी.

- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- संबंधित उप जिल्हाधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- उप सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-२).